**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील विशेष कार्य अधिकारी-नि-सदस्य (तांत्रिक) या पदाचे पदनाम बदलून संचालक (तांत्रिक) असे करणेबाबत व सदर पदास सचिव स्तरावरील वेतन व भत्ते लागू करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१३/प्र.क्र.२६३/पापु-२३

मंत्रालय मुंबई-४०००३२

तारीख: १२ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-**

1) **शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः संकीर्ण १०९६/१५८४/ प्र. क्र. १९६/ पापु-१७, दिनांक ३ जुलै, १९९७**
2) **शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०११/प्र.क्र.१६६/पापु-२३, दिनांक ११ ऑगस्ट, २०११**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अधिनियम, १९७६ मधील कलम ४ (१) (ग) मधील तरतुदीनुसार सदस्य सचिव हे एकमेव पद असून, या प्राधिकरणावरील पदावर राज्य शासनाने नियुक्ती करावयाची आहे.तथापि, दिनांक ३ जुलै, १९९७ च्या शासन निर्णयान्वये शासनाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे वाढलेले कामकाज व त्याचे सुयोग्यरीत्या नियंत्रण होण्याच्या दृष्टीने विशेष कार्य अधिकारी (तांत्रिक) व विशेष कार्य अधिकारी (प्रशासन व बाह्य अर्थ सहाय्य) अशी दोन पदे प्राधिकरणाच्या आस्थापनेवर निर्माण केलेली होती. कालांतराने विशेष कार्य अधिकारी (तांत्रिक) या पदाचे संबोधन सदस्य सचिव (तांत्रिक) असे करण्यात आले. तदनंतर शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. मजीप्रा-२०११/ प्र. क्र. १६६/ पापु-२३ दिनांक ११ ऑगस्ट, २०११ तील परिच्छेद ४ नुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सदस्य सचिव (तांत्रिक) या पदाचे संबोधन विशेष कार्य अधिकारी-नि-सदस्य (तांत्रिक) असे करण्यात आले होते. या पदावर नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यास तो घेत असलेल्या वेतनश्रेणीतील वेतन व अनुज्ञेय लाभ तसेच, त्यास सदस्य (तांत्रिक) या पदासाठी अनुज्ञेय असलेले अन्य लाभ देखील देय करण्यात आलेले होते. सदर पदाच्या पदनामामध्ये व वेतनश्रेणीमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या विशेष कार्य अधिकारी-नि-सदस्य (तांत्रिक) या पदाच्या पदनामामध्ये बदल करुन आता सदर पदाचे संबोधन संचालक (तांत्रिक) असे करण्यात येत असून हे पद महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या वरिष्ठ मुख्य अभियंत्यांमधून सेवाज्येष्ठता व अर्हता विचारात घेऊन पदोन्नतीने भरण्यात यावे.

२. या पदास सचिव स्तरावरील वेतन व भत्ते (३७४००-६७०००- ग्रेड वेतन १०,०००) लागू राहतील.

३. संचालक (तांत्रिक) हे सदस्य सचिव यांच्या अधिपत्याखाली कामकाज पाहतील/ हाताळतील.

४. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सर्व तांत्रिक बाबींवर संचालक (तांत्रिक) यांचे नियंत्रण राहील व शासनास पाणी पुरवठा व स्वच्छता विषयक तांत्रिक बाबींवर ते सल्ला देतील.

५. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६ मधील कलम ४ (१) (फ) मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक मंडळावर पाणी पुरवठा व जलनि:स्सारण या क्षेत्रातील विशेष ज्ञान किंवा अनुभव असलेले जे ६ सदस्य नियुक्त करण्यात येतात त्यामध्ये संचालक (तांत्रिक) हे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक मंडळावर पदसिद्ध (Ex- officio) सदस्य म्हणून कार्यरत राहतील

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१२१४४६०३८०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.08.12 16:41:46 +05'30'

**(महेश भ. सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मुख्य सचिव
२. मा. राज्यपालांचे सचिव
३. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव
४. मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव

५. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा.मंत्री, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा.राज्यमंत्री, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग
१४.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, मुंबई
१५.संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१६.अधीक्षक अभियंता (मुख्यालय), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१७.महालेखापाल महाराष्ट्र ०१ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
१८.महालेखापाल महाराष्ट्र ०० (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
१९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
२१.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२३.उप सचिव(आस्थापना), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२४.उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२६.मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२७.पा. पु. व स्व. वि. (सर्व कार्यासने)
२८.मंत्रालयातील इतर सर्व विभाग
२९.वित्तीय सल्लागास व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३०.निवडनस्ती, कार्यासन पापु-२३